**राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.१२ कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यास शासनहमी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१९/सपववि/प्र.क्र. ९४/अर्थबळ**
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १९ डिसेंबर, २०१९

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-१०९९/ प्र.क्र.६८/शा.हमी, दि.५/११/१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी-१००८/ प्र.क्र.१८/ शा.हमी, दि.२८/४/२००८
३) मा.मंत्रिमंडळाने दिनांक १५ डिसेंबर, २०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेला निर्णय

**प्रस्तावना -:**

राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.१२ कोटी अल्पमुदत कर्ज घेण्यासाठी शासन हमी देण्याबाबतच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने दि.१५/१२/२०१९ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने शासन हमी देण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे (ऋणको) या कारखान्यास महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून (धनको) रु.१२ कोटी (रु.बारा कोटी फक्त) अल्पमुदत कर्ज घेण्यासाठी शासन हमी देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन हमीवर कर्ज घेण्याची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यांपर्यंत वैध राहील.

३. शासन हमीवर कर्ज घेण्यासाठी धनकोसोबत करण्यात येणा-या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय किंवा करारनामा स्वाक्षरीत होण्यापूर्वी बँकेने कर्जाचे वितरण केल्यास शासन हमी अवैध ठरेल.

३.१) शासन हमी रु.१२ कोटी इतक्या कर्जाच्या रकमेपुरती मर्यादित राहील.

३.२) धनकोने राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे या कारखान्यास मंजूर केलेल्या कर्जाच्या परतफेडीचे वेळापत्रक करारपत्रात नमूद करावे व सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या कालावधीपर्यंतच शासन हमी वैध राहील.

३.३) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी शासन हमीवर घेतलेल्या कर्जाचा वापर कर्ज ज्या प्रयोजनासाठी घेतले आहे त्यासाठीच करणे व इथेनॉल निर्मिती प्रकल्प सुरु ठेवणे बंधनकारक राहील.

३.४) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे हे प्रमुख ऋणको (Principal Debtor) राहतील.

३.५) संबंधित कारखान्यास शासनाचे पुर्व परवानगीशिवाय सदर प्रयोजनासाठी अन्य कोणतेही कर्ज उभारता येणार नाही.

३.६) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांना मंजूर होणाऱ्या अल्पमुदत कर्जाची वसूली महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने टॅगींगद्वारे करावी. सदर कर्जाच्या प्रमाणात टॅगींग करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेची राहील.

३.७) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी धनको कडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरीता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता किंवा इतर कोणत्याही देय रकमेसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.८) सदर शासन हमीवरील कर्ज वसुलीकरीता साखरेचा पुरेसा साठा व इतर मालमत्ता तारण / प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतर कर्जाचे वितरण करण्यात यावे. साखर साठ्याचे कोणत्याही प्रकारे नुकसान होणार नाही व साखर साठ्याचे संरक्षण होईल याची व्यवस्था कारखाना करेल. तसेच थकहमीच्या पोटी साखर कारखान्याच्या मत्तेवर भार निर्माण करण्यात यावा.

३.९) कर्जाच्या परतफेडीबाबत होणा-या कसूरीची सुचना शासनास ३० दिवसांच्या आत देणे संबंधित धनकोला बंधनकारक राहील.

३.१०) धनकोने साखर कारखान्याच्या कार्यकारी/संचालक मंडळातील सदस्यांची सामुहिक व वैयक्तिक मालमत्ता तारण म्हणून घेतल्यानंतर कर्जाचे वितरण करण्यात यावे.

३.११) धनकोने कारखान्याकडून कर्जाची कायदेशीर मार्गाने वसूली करावी व तदनंतर कार्यकारी/संचालक मंडळातील सदस्यांच्या सामुहिक व वैयक्तिक मालमत्तेतून वसुली करण्यात यावी.

३.१२) धनकोने संबंधित कारखान्याकडून कर्ज वसुलीसाठी वरील सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय धनकोला हमी पूर्ततेकरीता शासन हमीचा प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित कारखान्याच्या चल / अचल मालमत्तेची विक्री अथवा लिलाव करुन वसुली करण्याचा निर्णय धनकोने घेतल्यास, त्याकरीता एक समिती गठीत करण्यात यावी व या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधीचा समावेश करण्यात यावा. विक्री प्रक्रियेचे अंतिमीकरण शासनाच्या मान्यतेने करण्यात यावे.

वरील परि. ३ मधील कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांना रु.१२ कोटी इतके कर्ज घेण्यासाठी देण्यात आलेली शासन हमी संदर्भाधिन अ.क्र. १ येथील दिनांक ५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहील:-

४.१) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे हे Principal Debtor राहतील.

४.२) सदर धनकोकडून घेण्यात आलेल्या कर्जाचा वापर ज्या प्रयोजनासाठी कर्ज घेण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी करण्यात यावा व त्याप्रमाणे पूर्तता अहवाल साखर आयुक्तांना सादर करावा.

४.३) सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी सदर कारखान्याची राहील.

४.४) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांना मंजूर होणाऱ्या कर्जाची पूर्ण वसूली करण्याच्या दृष्टीने साखर आयुक्तांनी वसूलीच्या प्रमाणात बँकेस टॅगींग करण्यासंदर्भात आवश्यक ते आदेश त्यांच्या स्तरावरुन निर्गमित करावेत. सदर टॅगींगवर देखरेख ठेवण्यासाठी साखर आयुक्त व सहकार आयुक्त यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४.५) राजगड सहकारी साखर कारखान्याच्या अल्पमुदत कर्जाची वसूली त्यांच्याकडे असणाऱ्या इथेनॉल प्रकल्पामधून येणाऱ्या उत्पन्नातून सुध्दा करावयाची आहे. यास्तव साखर कारखाना व साखर आयुक्त यांनी पुढच्या १५ दिवसात संयुक्त Escrow Account उघडून त्यामध्ये रकमा जमा होतील याची दक्षता घ्यावी. Escrow Account मध्ये जमा होणारी रक्कम अल्पमुदत कर्जाच्या खाती वर्ग करण्याबाबत कारखाना व साखर आयुक्त यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी. साखर कारखाना Escrow Account मध्ये रक्कम जमा करत असल्याची साखर आयुक्त यांनी वेळोवेळी खात्री करावी.

४.६) महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने शासन हमीबाबत केलेली विनंती ही सर्व बाबींचा सारासार विचार करुन केली असल्याकारणाने बँकेच्या विनंतीनुसार सदर कारखान्यास राज्य शासनामार्फत थकहमी मंजूर करण्यात येत आहे. यास्तव सदर कर्जाच्या परतफेडीसाठी संबंधित कारखाना व बँकेची समान जबाबदारी राहील.

४.७) राज्य शासनाने दिलेल्या हमीमध्ये बँकेने कोणत्याही प्रकारची कपात न करता कारखान्यास रक्कम उपलब्ध करुन द्यावी. तसेच, बँकेने थकहमीच्या रकमेमध्ये कपात केल्यास सदर थकहमी रद्द करण्यात येईल.

४.८) सदर Escrow Account मधून महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेला त्यांच्या परतफेड वेळापत्रकानुसार (Repayment Schedule) देय कर्जाची रक्कम अदा केली जाईल याची साखर आयुक्तांनी दक्षता घ्यावी.

४.१०) वरील प्रमाणे आवश्यक ती कार्यवाही व सनियंत्रण करण्याची जबाबदारी सहकार विभागाची राहील.

४.११) शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही याबाबतची संपुर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/साखर आयुक्त पुणे यांची राहील.

४.१२) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती सहकार, पणन व वस्त्रोद्योग / वित्त विभागाकडे सादर करावी.

४.१३) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या संस्थेच्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

४.१४) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर सहा महिन्यांनी (३०मार्च/३०सप्टेंबर) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागास सादर करेल.

## ५. <u>हमी शुल्क</u>

५.१) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे या कारखान्यास सदर शासन हमीवरील हमीशुल्काचा दर प्र. श.प्र.व. रु.२/- असा राहील.

५.२) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरिता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर देय राहील.

५.३) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यांनी करण्यास राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि/ अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या कर्जावर देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा अनुक्रमे १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

५.४) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांचेकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

५.५) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी शासन हमी शुल्काची रक्कम "८२३५-सर्वसाधारण व इतर राखीव निधी, ११७-हमी विमोचन निधी (८२३५५०४५०१)" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी.

५.६) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास पाठवावी.

५.७) राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग तसेच, साखर आयुक्त हे संबंधित कारखान्याकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

५.८) शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत व नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.ससाका-२०१९/प्र.क्र.१५१/३स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.- ८/२०१९-२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे यांनी धनकोकडून कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९१२१९१५४४५४४२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: CN = Jayant Balkrishna Kulkarni, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2019.12.19 17:49:23 +05'30'

**( ज.बा. कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपालाचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,
६) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई (५ प्रती)
१०) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,
११) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२०
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४.
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्स्कवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१
१४) इंडियन नॅशलन कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई -२५.
१५) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-२१.
१६) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
१७) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१८) सहकार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, साखर संकुल, शिवाजी नगर, पुणे-४११००५.
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२३) कार्यकारी संचालक, राजगड सहकारी साखर कारखाना भोर, जि. पुणे
२४) वित्त विभाग (ऋण व हमी संनियंत्रण कक्ष/व्यय-२), मंत्रालय, मुंबई-३२.
२५) कक्ष अधिकारी (३ स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२६) निवडनस्ती/ अर्थबळ.

-------------

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| **9** Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| **10**. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| **11.** Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| **12**. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| **13.** If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| **14**. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| **15.** Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |